**विविध कृषि पुरस्कार व पीक स्पर्धा विजेते शेतकऱ्यांचा सत्कार करण्याची योजना सन २०१०-११ मध्ये चालू ठेवण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**

कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग

शासन निर्णय क्रमांकः कृभुपु-२०१०/प्र.क्र.१६०/११अे,

मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२

**दिनांक :- १८ ऑगस्ट, २०१०**

**वाचा :**

१) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र.-कृसंप्र -२१९१/प्र.क्र.१०४/११अे, दि.३० सप्टेंबर, १९९१

२) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र.-कृसंप्र -१२०७/प्र.क्र.१(भाग-२)/११अे, दि.२३ जून, २००८

३) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र.-कृपुसं-२००८/प्र.क्र.३२१/११अे, दि.०९ सप्टेंबर, २००८

४) कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.कृमावि/१९५(भाग-३)/स.समा.अनु./३१७/ विप्र-४/२०१०, दि.१४ जून, २०१०

**शासन निर्णय :**

राज्यात कृषि व कृषि संलग्न क्षेत्रामध्ये उल्लेखनीय कार्य करणाऱ्या व्यक्ती/संस्था यांना दरवर्षी डॉ.पंजाबराव देशमुख कृषिरत्न, वसंतराव नाईक कृषिभूषण, जिजामाता कृषिभूषण, वसंतराव नाईक शेतीमित्र व वसंतराव नाईक शेतीनिष्ठ शेतकरी इ. कृषि पुरस्कार आणि फलोत्पादन क्षेत्रामध्ये उल्लेखनीय कार्य करणाऱ्या व्यक्तींना उद्यान पंडीत पुरस्कार प्रदान करुन त्यांचा व पीक स्पर्धा विजेते शेतकऱ्यांचा उचित सत्कार करुन सन्मानित करण्यात येते. उपरोक्त क्र.२ येथील दि.२३ जून, २००८ च्या शासन निर्णयान्वये डॉ.पंजाबराव देशमुख कृषिरत्न, वसंतराव नाईक कृषिभूषण, जिजामाता कृषिभूषण, वसंतराव नाईक शेतीमित्र व वसंतराव नाईक शेतीनिष्ठ शेतकरी पुरस्कारांचे स्वरुप तसेच उपरोक्त क्र.३ येथील दि.९ सप्टेंबर, २००८ च्या शासन निर्णयान्वये पीक स्पर्धा विजेते शेतकऱ्यांना प्रदान करावयाच्या पुरस्कारांचे स्वरुप निश्चित करण्यात आलेले आहे.

२. सदर योजना सन २०१०-११ मध्ये चालू ठेवण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे. सदर पुरस्कार, रोख बक्षिसे व सत्कार समारंभासाठी अपेक्षित रु.३०.०० लक्ष (अक्षरी रुपये तीस लक्ष फक्त) इतक्या खर्चास शासन मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर प्रयोजनार्थ उपलब्ध करुन दिलेली रक्कम संक्षिप्त देयकावर एकरकमी काढण्यास खालील अटींच्या अधिन राहून शासन मान्यता देण्यात येत आहे.

१) प्रस्तुत प्रयोजनार्थ यापूर्वी संक्षिप्त देयकावर काढलेल्या रकमेचे निपटारा प्रमाणपत्र (Clearance Certificate) प्राप्त करण्याकरिता विभागीय कृषि सहसंचालक, कोकण विभाग, ठाणे या कार्यालयाने पत्र क्र.विकृसस/कृषि-४/ब-७/२८२६/२०१०,दि.२९.४.२०१० अन्वये महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व हकदारी), मुंबई यांना प्रस्ताव सादर केला होता. त्यास महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व हकदारी), मुंबई यांनी पत्र क्र.डी.सी.७/ओबीए.मद /मु.शी/२४०१/६३४, दि.२६.५.२०१० अन्वये मान्यता दिली आहे. त्यामुळे तपशिलवार देयक सादर करणे प्रलंबित नाही.

२) शेतकरी सत्कार समारंभाचे देयक कोषागारास सादर करण्यासाठी कोणत्याही खर्चाचे उपप्रमाणके व सत्कारार्थी शेतकऱ्यांची यादी देयक सादर करण्याच्या अगोदर प्राप्त होत नाही. त्यामुळे कोषागारात खर्च नियमित देयकाद्वारे सादर करणे शक्य होत नाही.

३) वित्त विभागाच्या मान्यतेनंतर संक्षिप्त देयक रक्कम काढण्यात आल्यानंतर त्याचे तपशिलवार देयक रक्कम काढल्यापासून एक महिन्याच्या आत सादर करण्यात येईल.

४) सदर संक्षिप्त देयकाचे तपशिलवार देयक विहित मुदतीत सादर करण्याची जबाबदारी विभागीय कृषि सहसंचालक, कोकण विभाग, ठाणे यांची राहील.

५) मासिक निधी विवरण पत्रानुसार उपरोक्त रक्कम माहे ऑगस्ट, २०१० मध्ये खर्च करण्यास उपलब्ध आहे.

४.	सदर प्रयोजनार्थ कृषि संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे आणि विभागीय कृषि सहसंचालक, कोकण विभाग, ठाणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५.	यावर होणारा खर्च वित्त विभागाने प्राधिकृत केल्यानुसार खालील लेखाशिर्षाखाली सन २०१०-११ करिता मंजूर करण्यात आलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

मागणी क्र.डी-३, २४०१- पीक संवर्धन
१०९- विस्तार व प्रशिक्षण,
(००) (०३) पीक स्पर्धा (२४०१ ०७५३) (योजनेतर)

६.	सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१५८/१०/व्यय-१, दि.३१.०७.२०१० व क्र.३३९/२०१०/विनियम दि.३१.०७.२०१० अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

७.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०१००८१८१५४७३७००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**( ब. दि. उमाटे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे
२. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
३. सहसचिव (फलोत्पादन), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
४. कृषि संचालक (विस्तार व प्रशिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
५. विभागीय कृषि सहसंचालक कोकण विभाग, ठाणे
६. विभागीय कृषि सहसंचालक नागपूर विभाग, नागपूर
७. महालेखापाल, महाराष्ट्र १/२, (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर
८. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे/ठाणे
९. कक्ष अधिकारी, का.१४-अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१०.वित्त विभाग (व्यय-१)/(अर्थसंकल्प/विनियम), मंत्रालय मुंबई-३२
११.मा.अपर मुख्य सचिव (कृषि) यांचे स्विय सहायक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१२.निवडनस्ती.